तरंगती जेट्टी व तत्सम सुविधा उभारणे (३०५१ १८३५) या योजनेसाठी सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रू. ३२.४८ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०१२२/प्र.क्र.१०/बंदरे-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १४ मार्च, २०२२

संदर्भ:- १. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र जा क्र.ममेबो/मुकास/अभि/निधी वितरण प्रस्ताव /३०५१ १८३५/ २०२१-२२/४०४ दि.२८.०१.२०२२

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. १४.१०.२०२१

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. ०३.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा उभारणे” या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. ६३.५१ कोटी इतक्या रकमेपैकी रु. ३२.४८/- कोटी (रुपये बत्तीस कोटी अठ्ठेचाळीस लक्ष) इतका निधी खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय किंमत | सन २०२१-२२ करिता आवश्यक निधी |
|---|---|---|---|
| १ | तोराडी, ता. म्हसळा, जि. रायगड येथे जेट्टीचे बांधकाम करणे | ४.९९ | ४.९९ |
| २ | मांडवा (कोळगांव), ता. अलिबाग, जि. रायगड येथे जेट्टी व तदानुषंगिक कामे करणे | ३.०० | ३.०० |
| ३ | आदगांव, ता. श्रीवर्धन, जि. रायगड येथे जेट्टीचे बांधकाम करणे | ३.१६ | १.५० |
| ४ | बेलापूर नवी मुंबई सेक्टर ११ येथील शिपयार्डकरिता पायाभुत सुविधांचे काम करणे. | ५.०० | ३.०० |
| ५ | मनोरी, जेट्टी येथे वाहनतळ निर्माण करणे. | ४.७५ | ४.७५ |
| ६ | राजबंदर, ता. उरण जि. रायगड येथील अस्तित्वातील जेट्टीची दुरूस्ती करणे. | ३.४१ | २.५० |
| ७ | थळ ता. अलिबाग जि. रायगड येथे जेट्टीलगत जोडरस्त्याचे बांधकाम करणे | ५.०० | २.५० |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | वर्सोली चाळमाळ, ता. अलिबाग जि.रायगड येथे खाडीमुखाजवळ मार्गदर्शक स्तंभाची उभारणी करणे. | १.२४ | १.२४ |
| ९ | जयगड घाट ते जेट्टीपर्यंत जाणारा रस्ता दुरुस्त करणे, ता. जि. रत्नागिरी | ३.०१ | २.०० |
| १० | जयगड पाईल जेट्टीचे माजाबुतीकरण करणे, ता. जि. रात्नागिरी | ५.०० | ३.०० |
| ११ | राजपुरी, ता. मुरूड जि. रायगड येथील प्रवासी टर्मिनल इमारतीलगत वाहनतळ विकसित करणे. | ४.९३ | ४.०० |
| | एकूण | ४३.४९ कोटी | ३२.४८ कोटी |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १४.१०.२०२१ व दि.०३.०२.२०२२ च्या शासन निर्णय व परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२२ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च " “मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र. ३०५१- बंदरे व दिपगृहे, (०२) लहान बंदरे, (१९०) सार्वजनिक उपक्रम व इतर उपक्रमांना सहाय्य, (००)(०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान-तरंगती जेट्टी व तत्सम प्रवाशी सुविधा उभारणे (३०५१ १८३५), ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१/१४६१/ दि.०२.०२.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ६८/२०२२/व्यय-८, दि.२४.०२.२०२२ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०३१४१८०६०३७९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2022.03.14 18:07:38 +05'30'

**( निलीमा कांबळे )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती (बंदरे-२).